वनविभागातील गट- ब (अराजपत्रित) व गट- क संवर्गातील पदे सरळसेवेने भरण्याकरिता समिती गठीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वनविभाग

**शासन निर्णय क्रमांक :- एफएसटी-०९/१८/प्र.क्र.३७६/फ-४**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,

दिनांक :- १९ जानेवारी, २०१९

वाचा :- (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक १२१६/(प्र.क्र.६५/१६)/१३-अ,दिनांक १३/०६/२०१८.

(२) शासन पत्र, महसूल व वन विभाग क्रमांक:- एफएसटी-०८/१८/प्र.क्र.४६९/फ-४, दि.१४.०१.२००९.

(३) शासन पत्र, महसूल व वन विभाग क्रमांक:- एफएसटी-०८/१८/प्र.क्र.४६९/फ-४, दि.२१.०७.२००९

(४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष १०(२)/आस्था/एक/प्र.क्र.४० (१८-१९)/१३८, दि.१०.०७.२०१८.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय महसूल व वन विभाग दि.२१.०७.२००९ अन्वये वन विभागातील गट-क व गट-ड संवर्गातील रिक्त पदे नामनिर्देशनाने भरण्यासाठी प्रादेशिक निवड समिती व राज्यस्तरीय निवडसमिती गठीत करण्यात आली होती. तथापि, सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१३.०६.२०१८ च्या शासन निर्णयान्वये जिल्हास्तरीय गट-ब (अराजपत्रित) व गट-क ची पदे भरण्यासाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा निवड समित्यांची स्थापना केलेली असून गट-क च्या पदावरील उमेदवार निवडण्याची कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे. सदरहू आदेशातील तरतूदीनुसार वन विभागातील गट-ब (अराजपत्रित) व गट-क ही पदे नामनिर्देशनाने भरण्याकरीता सुधारीत प्रादेशिक समिती व राज्यस्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन निर्णय दि.२१.०६.२००९ अन्वये गठीत केलेली प्रादेशिक समिती व राज्यस्तरीय समिती अधिक्रमित करून वन विभागांतर्गत गट-ब (अराजपत्रित) व गट-क संवर्गातील सरळसेवेने पद भरतीची कार्यवाही करण्यासाठी खालीलप्रमाणे प्रादेशिक निवडसमिती व राज्यस्तरीय निवडसमिती गठीत करण्यात येत आहे.

**(अ) गट-क या संवर्गातील प्रादेशिक पदे (लेखापाल, सर्व्हेक्षक इत्यादी) भरण्याकरीता प्रादेशिक विभाग प्रमुख यांच्या अध्यक्षतेखाली प्रादेशिक निवडसमिती**

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) | अध्यक्ष |
| २) | विभागीय वन अधिकारी / विभागीय वन अधिकारी उपलब्ध नसल्यास सहाय्यक वनसंरक्षक<br>(अनुसुचित जाती / अनुसूचित जमाती या प्रवर्गातील अधिकारी) क्र.६ मधील सदस्य या प्रवर्गातील नसल्यास | सदस्य |
| ३) | सहाय्यक वनसंरक्षक<br>अल्पसंख्यांक अधिकारी (क्रमांक ६ चे सदस्य अल्पसंख्यांक नसल्यास) | सदस्य |
| ४) | महिला अधिकारी (निवडसमितीचे अध्यक्ष किंवा अ.क्र.२,३ व ६ येथील सदस्यांपैकी कोणीही महिला नसल्यास) | सदस्य |
| ५) | संबंधित वनवृत्ताचे वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण | सदस्य |
| ६) | वनवृत्तातील ज्येष्ठ उपवनसंरक्षक | सदस्य सचिव |

**(ब) गट-ब (अराजपत्रित) व गट-क या संवर्गातील काही पदे (कनिष्ठ अभियंता / लघुलेखक (निम्नश्रेणी), लघुलेखक (उच्चश्रेणी), वरीष्ठ सांख्यिकी सहाय्यक व कनिष्ठ सांख्यिकी सहाय्यक इत्यादी) राज्यस्तरीय असल्याने सदर पदांची भरती कार्यवाही करण्याकरीता राज्यस्तरीय निवडसमिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे-**

| | | |
|---|---|---|
| १) | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर | अध्यक्ष |
| २) | विभागीय वन अधिकारी / विभागीय वन अधिकारी उपलब्ध नसल्यास सहाय्यक वनसंरक्षक<br>(अनुसुचित जाती / अनुसूचित जमाती या प्रवर्गातील अधिकारी) क्र.६ मधील सदस्य या प्रवर्गातील नसल्यास | सदस्य |
| ३) | विभागीय वन अधिकारी / विभागीय वन अधिकारी उपलब्ध नसल्यास अल्पसंख्यांक अधिकारी (क्रमांक २ चे सदस्य अल्पसंख्यांक नसल्यास) | सदस्य |
| ४) | महिला अधिकारी (निवडसमितीचे अध्यक्ष किंवा अ.क्र.२,३ व ६ येथील सदस्यांपैकी कोणीही महिला नसल्यास) | सदस्य |
| ५) | प्रशासकीय अधिकारी, मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर वनवृत्त नागपूर यांचे कार्यालय | सदस्य |
| ६) | मुख्य वनसंरक्षक (मानव संसाधन व्यवस्थापन), नागपूर | सदस्य सचिव |

२. सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि.१३.०६.२०१८ मधील मार्गदर्शक सुचना विचारात घेऊन वन विभागातंर्गत गट-ब (अराजपत्रित) व गट-क या संवर्गातील रिक्त पदे प्रचलित शासन निर्णयातील तरतूदीनुसार भरण्याबाबतची कार्यवाही तात्काळ सुरु करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०११९१६१५५७१७१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2019.01.19 16:25:05 +05'30'

**(सुजय दोडल)**
सह सचिव (वने)
महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराट्र राज्य, पुणे
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ, नागपूर
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६. सर्व मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक / उपवनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी सामाजिक वनीकरण
७. सर्व जिल्हाधिकारी
८. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०.सचिव (वने) यांचे स्वीय सहायक
११.सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय-३२
१२.वन विभागातील सर्व कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२
१३.निवडनस्ती फ-४ कार्यासन